**रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र.एसपीबी-२०२० / प्र.क्र. २३ / सां.का.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०९ मार्च, २०२०

संदर्भ : १) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, क्र.संकीर्ण-२००१/प्र.क्र.२९८/सां.का.१, दि.२३ मार्च, २००६
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.एसपीबी-२०१९/प्र.क्र.३२/सां.का.१, दि.२५ सप्टेंबर, २०१९
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१२ फेब्रुवारी, २०२०

**शासन निर्णय** :

उपर्निर्दिष्ट दि.२३ मार्च, २००६ च्या शासन निर्णयान्वये सांस्कृतिक कार्य या उपविभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असलेल्या क्षेत्रीय कार्यालयामधील पदांचा आढावा घेऊन पदांच्या सुधारीत आकृतीबंधास मान्यता देण्यात आलेली आहे. या आकृतीबंधानुसार रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई या कार्यालयासाठी मंजूर करण्यात आलेल्या अस्थायी पदांना उपर्निर्दिष्ट दिनांक २५ सप्टेंबर, २०१९ च्या शासन निर्णयान्वये दि.२९ फेब्रुवारी, २०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. आता वित्त विभागाने उपर्निर्दिष्ट दि.१२ फेब्रुवारी, २०२० च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या अधिकारात रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई या कार्यालयातील खालील अस्थायी पदांना या शासन निर्णयान्वये दि.३१ ऑगस्ट, २०२० पर्यंत मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | लिपिक / टंकलेखक | ०१ | S-६ : १९९००-६३२०० |
| २ | दप्तरी | ०१ | S-३ : १६६००-५२४०० |
| ३ | शिपाई | ०२ | S-१ : १५०००-४७६०० |
| ४ | लघुलेखक | ०१ | रु.२०,०००/- (ठोक मानधन) |
| **एकूण - ०४ पदे** | | ०५ | |

२. उपरोक्त पदे ज्या प्रयोजनार्थ निर्माण केली आहेत त्याच प्रयोजनार्थ या पदांचा विनियोग करण्यात यावा. या पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नसावे. यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती (०२) रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळाचे कार्यालय (०२), (०१) राज्य रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई (२२०५ १३८३)" या लेखाशिर्षाखाली त्या त्या वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२००३०९१३०८०९२२२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shailesh Tukaram Jadhav

Digitally signed by Shailesh Tukaram Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f28af075ed91b64d12528e9ab00bb144f43fcf33c23ccf14c820b969f8ca273, serialNumber=a90555ec4a073187eb44ee0b1aa93e5c855afff34eedb4b03bb3e0a6cfd6271c, cn=Shailesh Tukaram Jadhav
Date: 2020.03.09 14:44:40 +05'30'

**( शैलेश तु. जाधव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सचिव, रंगभूमी प्रयोग परिनिरिक्षण मंडळ, मुंबई.
२. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता )-१, महाराष्ट्र, मुंबई
३. महालेखापाल ( लेखापरीक्षा )-१, महाराष्ट्र, मुंबई
४. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता )-२, महाराष्ट्र, नागपूर
५. महालेखापाल ( लेखापरीक्षा )-२, महाराष्ट्र, नागपूर
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८. वित्त विभाग (व्यय १५ ), मंत्रालय, मुंबई
९. अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.निवड नस्ती - सां.का.१